इच्छा असेल तर ती अधिकार तिने मिळवायला नाही का? आपल्या त्याचा मान राखायला नको का? एस.डी. बरोबर कशावरून वाजलं? सी. रामचंद्रशी का फाटलं? ओ.पी. कडे एकही गाणं का गायलं नाही? शंकरशी का बिनसलं? आशाशी तिचे संबंध कसे आहेत? नवीन गायिकांची गळचेपी केली का? (इतर का केली नाही?)... या व अशा अनेक प्रश्नांची उत्तरं देण्यासाठी या सर्वांना तिने आरोपीच्या पिंजऱ्यात उभं रहायचं का? बरं, तिने या प्रश्नांना उत्तरं दिली तरी त्यावरून वादावादीच माजणार. तिने उत्तरं दिली नाहीत मग तर विचारायलाच नको. सर्व प्रश्नांना बगल देणारे पळवाटवादी, सपक आत्मचरित्र' अशी संभावना टीकाकार करणार. का विकावं तिनं?

मागे बोलता बोलता ती नाइलाजाने म्हणाली होती, "सज्जाद हुसेन तलत महमूदला 'गलत' महमूद व गीता दत्तला 'जूता' दत्त म्हणायचा."

पण हे सत्य तिने आत्मचरित्रात लिहिलं तर वादळ घोंघावेल. लोक म्हणतील, "सज्जाद उगीच कोणाला काही म्हणेल. तो तसाच होता पण ते अवघी चव घेऊन सांगणं तिला या वयात शोभतं का? आपल्या सहकाऱ्यांविषयी बोलताना तिने स्वतःची पातळी गाठली आहे."

आणि गंमत म्हणजे तलतशी तिचे जिव्हाळ्याचे संबंध होते आणि गीता तर तिची मैत्रीण होती. नावं ठेवायला जर आगीचा डोंब उसळणार असेल तर आत्मचरित्राच्या वाटेला न जाणंच श्रेयस्कर.

पण एक गोष्ट काही केल्या मनातून जात नाही. चित्रपट संगीताच्या फार मोठ्या कालखंडाची ती जितीजागती व गाती साक्षीदार आहे. गुलाम हैदरपासून ए. आर. रेहमानपर्यंत अनेक बहुगुणी संगीतकारांच्या रेकॉर्डींग रूममधून ती सोन्यासारखं घडवलंय. ती गाणी आमच्या कानात रुंजी घालतायत, आमच्या मनाला आल्हाद देतायत, आमच्या जखमांवर फुंकर घालतायत, आम्हाला 'जीने का बहाना' देतायत. पण आम्हाला आणखी काय काय हवंय. करोडो कानसेनांना गाण्यांच्या जन्माच्या संगीतकारांच्या,

नाटा असल्याचं बोललं जातं त्यात कितपत तथ्य आहे? 'आंधियाँ' तील आणि अनवर खानने संगीतबद्ध केलेल्या 'है कहीं पे शादमानी' या तीन भाषांतील (गाण्यातील) तिसऱ्या भाषांतील कडव्याची चाल आपली आहे, हा सहायक जयदेवचा दावा बरोबर आहे का? 'सत्यम् शिवम् सुंदरम्' मधल्या शीर्षक गीताची चाल 'कहीं दाग ना लग जाये' चीच पुनरावृत्ती आहे असं लताने सांगितल्यावर 'बोलू नको कुठे' असं राज कपूर तिला म्हणाला होता का? 'शीलाला सांग की काळजी करू नकोस. मी तिला व मुलांना उघड्यावर पडू देणार नाही. मी आहे नाही ते सगळं तिच्या नावावर ठेवणार आहे' असं संबंध दुरावलेला पती मदन मोहन नशेत रात्री फोन करून लताला म्हणाला होता का? मधाळ गाणी लिहिणारा डी. एन. मधोक अनेकदा चांगल्या चालीही लावायचा पण त्या संगीतकारांच्या ~~नावा~~ नावावर गेल्या यात किती सत्य आहे? शंकरची गाणी कुठली व जयकिशनची कुठली? हुस्नलालची गाणी कुठली व भगतरामची कुठली? कल्याणजींची कुठली व आनंदजींची कुठली? लक्ष्मीकांतची कुठली व प्यारेलालची कुठली? 'ठीक तरहसे गाइये लताजी. ये नौशादकी धुन नहीं है' असं व या शब्दात ~~सज्जाद~~ सज्जाद हुसेन म्हणाला होता का? 'आप अंतरा बोलिये, मैं असाई पहचान सकता हूँ' असं लता एका अपघाती भेटीत ओ.पी.ला म्हणाली होती ~~व~~ व हे ऐकून चपापलेला ओ.पी. पेटी वाजवायला निघाला होता, ही ओ.पी.ने सांगितलेली आठवण खरी आहे का? वसंत देसाईंच्या चालीतील काही आलाप लताने दिलेत हे खरं का? एस. डी. तिला 'लोटा' म्हणायचा का? 'बाजार', 'लाहोर' व 'अलिफ लैला' मध्ये श्यामसुंदरने लताला नूरजहान ढंगात गायला लावलं की नूरजहानच्या तत्कालीन प्रभावामुळे लता स्वतःहूनच तशी गायली? सैलेश ('परिचय'), बसंत प्रकाश ('सलोनी'), बलसारा ('मदमस्त') यासारख्या अप्रसिद्ध पण गुणी संगीतकारांविषयी तिला काय वाटतं? तिला सर्वाधिक चांगली गाणी तिच्या मते कोणी दिलीत — शंकर-जयकिशनने, मदन मोहनने, सी. रामचंद्रनं की नौशादनं? की हे सोडून तिला आणखी कोणाचं नाव घ्यावंसं वाटतंय? एकूण चित्रपट संगीतकारांची गाण्याची चाल शिकवण्याची पद्धत कशी होती? कोण चालीत लवमात्र बदल करू द्यायचा नाही? सर्वात

'ओरिजिनल' संगीतकार कोण? सर्वांत प्रतिभावान संगीतकार कोण? तिच्या गाण्याला पडद्यावर सर्वाधिक न्याय देणारी नायिका कोण – मधुबाला, मीनाकुमारी, वहीदा की नूतन? की या सोडून तिला आणखी कोणाचं नाव घ्यावंसं वाटतंय? संगीतकाराचे समाधान झाल्यावरही पुन्हा गाणं रेकॉर्ड करण्याचा आग्रह तिने किती वेळा धरलाय? अमुक एका गाण्याला आपण पुरेसा न्याय देऊ शकलो नाही असं तिला स्वतःला नंतर कधी वाटलंय का? 'बरसात' मधील गाजलेल्या गाण्यांबाबत ती स्वतः असमाधानी होती हे खरं का? तिने कधी कोणा संगीतकाराचं नाव निर्मात्याच्या गळी उतरवलंय का? सहगायकाच्या निवडीबाबत तिने कधी आग्रही व अडवणुकीची भूमिका घेतली होती का? पैशावरून तिने गायचं नाकारलंय का? नवीन गायिकांविषयी तिला नक्की काय वाटतं? ती स्वतःची जुनी गाणी आवडीने ऐकते का? आपण लोकांचं जीवन किती समृद्ध केलंय याची तिला जाणीव आहे का? 'भारतरत्न' पेक्षा मोठं व वेगळं असं तिला काही हवं होतं का? नियतीनं पदरात टाकलेल्या दानाबाबत ती पूर्ण समाधानी व संतुष्ट आहे का? आहे मनोहर तरी गमते उदास अशी आज वयाच्या ऐंशीच्या वर्षी तिची मनोवस्था आहे का? सर्वसामान्य माणसांना होणारे आजार व दुखणी आपल्यालाही असावेत याचं तिला कधी आश्चर्य वाटतं का?.... अशा असंख्य मुद्द्यांवर ती मनमोकळं बोलू शकते. आम्ही सुपाएवढे कान करून ऐकू. ती लिहू शकते. आम्ही रागांचा विचार करून बघू. आमच्या व्यथा, वेदना विसरून आम्ही तिने गायलेल्या संगीतमय दुनियेत हरवून जाऊ. पण त्यासाठी औदासिन्य व कटुता सारून टाकून तिने लिहिण्याला मन हवं. आपण हे रसिकांचं देणं लागतो ही भावना प्रबळ झाली तरच तिच्या हातून आत्मचरित्र घडेल. अन्यथा नाही.

लताच्या मौनव्रतामुळे मराठी लेखक पुढे सरसावलेत व लताचं चरित्र असं डायरेक्ट न म्हणता त्यांनी आपल्या मगदुराप्रमाणे लताचं चरित्र लिहिण्याची हिंमत केलेय. अनेकांचा मगदूर खूपच कमी आहे. लेखनाला अभ्यासाची व जाणकारीची जोड देण्याची न पेलणारी जबाबदारी त्यांनी आपली मानलेली नाही. एका समीक्षकाने जाणकारांच्या

आदरपूर्ण आभास निर्माण करीत व त्यांशी जवळीक असल्याचे सूचित करीत लताबाबत ग्रंथ लिहिलाय. त्यात जागोजागी धक्कादायक आरोप मांडून सोयीस्कर असे निष्कर्ष काढलेत. उदाहरणार्थ, एस. डी. बर्मनने अमुक एक गाणं मदन मोहनला न देता आवर्जून किशोरकुमारला का दिलं? मग गायकांची जात व त्याला किशोरकुमारचा स्वर कसा योग्य आहे यावर त्याने सखोल, अभ्यासपूर्ण विवेचन केले व एस. डी. ची गायकांची निवड किती काटेकोर व अचूक असायची हे सप्रमाण पटवून दिल्याचा आव आणला. खरी गोष्ट अशी होती की त्या सुमारास रफी हजला गेल्यामुळे उपलब्ध नव्हता व पर्यायी योजना म्हणून एस. डी. ने किशोरकुमारकडून गाणं गाऊन घेतलं.

या ग्रंथात त्याने लताबाबत सोडून सगळ्या दिवंगत संगीतकारांना उद्धृत केलंय. ते खरोखरच बोलले असतील-नसतील पण आपल्या बनावटीची जबाबदारी घेण्यास ते हयात नसताना त्यांच्या नावे विधानांचा असा सर्रास वापर करणे कितपत योग्य आहे?

"त्याने तुम्हाला 'कोट' करायला हवं होतं" लता मला म्हणाली, "मग बघा मी तुम्हाला कसं कोर्टात खेचायचं असतं ते."

"मला फुकट पब्लिसिटी मिळाली असती. लताबरोबर कोर्टात हिंडलेला माणूस अशी माझी ओळख झाली असती." मी म्हणालो.

लता लिहीत नाही म्हणून इतर लिहीत सुटतात व चुकीची, खोडसाळ माहिती ग्रंथबद्ध झाल्याने सत्य ठरते. आणखी पाच पन्नास वर्षांनी हेच त्रिकाल सत्य म्हणून जगापुढे येणार आहे. आणि त्याची अप्रत्यक्ष जबाबदारी लतावर येते. कारण पुन्हा तेच - लता आत्मचरित्र लिहीत नाही.

तेव्हा बाई गं, तू लिहूनच टाक एकदा आत्मचरित्र. कठीणही अवघड गाणं - अगदी सज्जाद व हृदयनाथपर्यंतचं - तुझ्या गळ्याला अवघड वाटलं नाही. मग हे आव्हान पेलणं तुला काय अवघड आहे?

बघ, याही खेपेला तू माझं ऐकलं नाहीस तर मी सरळ तुला अहोजाहो करायला लागीन, परक्यासारखं.

shireeshkanekar@hotmail.com